महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० च्या कलम ८८ अंतर्गत चंद्रपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेच्या चौकशीस मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन आदेश क्र. जिमस ०१२५/ प्र.क्र.२०/२-स**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२**
**दिनांक : २८ फेब्रुवारी, २०२५**

वाचा :- (१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक कृषीपत-०७/चंद्रपूर जिमस/ कलम-८८चौ.मुदतवाढ/१७०/२०२५, दि.२०.०१.२०२५.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम ८८ अन्वये निबंधकास प्राधिकृत अधिकारी नेमून अपचारी प्रवर्तक वगैरे विरुद्ध चौकशी करण्याचे आदेश देण्याचे अधिकार आहेत. प्रचलित तरतूदीनुसार अशी चौकशी २ वर्षात पुर्ण करणे आवश्यक आहे. तथापी, निबंधकास याबाबतची कारणे नमूद करुन जास्तीत जास्त ६ महिने चौकशीस मुदतवाढ देता येते. तसेच शासनाला निबंधकाच्या अहवालावरुन अथवा स्वतःहून लेखी कारणे नमूद करुन, कलम ८८ च्या पोटकलम (१) अन्वये चौकशीची कार्यवाही पूर्ण करण्याकरिता वेळोवेळी आवश्यक असेल त्याप्रमाणे उक्त कालावधी वाढवून देता येईल अशी तरतूद आहे.

२. चंद्रपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेची महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम ८८ अंतर्गत काही मुद्यांबाबत चौकशी करुन अहवाल सादर करण्याकरीता श्री. पी.एस. धोटे, सेवानिवृत्त जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, चंद्रपूर यांची प्राधिकृत अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे.

३. सदर चौकशीचे कामकाजानुसार महाराष्ट्र सहकारी संस्था नियम ७२ (४) चे कामकाज पुर्ण करण्यात आले असून सद्य:स्थितीत नियम ७२ (५) नुसार युक्तीवादाचे कामकाज अंतिम टप्प्यात असल्याने कामकाज पुर्ण करण्यासाठी काही कालावधी लागणार आहे. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर यांनी चौकशी पूर्ण करण्यासाठी यापुर्वी मुदतवाढ दिली आहे. सदरच्या कालावधीत चौकशी पूर्ण न झाल्याने विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर यांच्या कार्यालयाकडील दिनांक २३.०६.२०२२ रोजीच्या आदेशाव्दारे सदर चौकशी पूर्ण करण्यासाठी दिनांक २२.१२.२०२४ पर्यंतचा कालावधी वाढवून देण्यात आला होता.

४. तथापि, सदर मुदतवाढ दिनांक २२ डिसेंबर, २०२४ रोजी संपुष्टात आली असल्याने सदर चौकशीस पुढील तीन महिन्यांपर्यंत मुदतवाढ देण्याबाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी उपरोक्त वाचा येथील पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे.

त्यानुसार चंद्रपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेच्या कलम ८८ अंतर्गत चौकशीबाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी केलेली शिफारस विचारात घेता सदर बँकेच्या कलम ८८ अंतर्गत सुरु असलेल्या चौकशीसाठी पुढे मुदतवाढ देणे आवश्यक असल्याची शासनाची खात्री झाली आहे. त्यामुळे महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ८८ च्या पोट कलम (१) अंतर्गत शासनास असलेल्या अधिकारान्वये खालील प्रमाणे आदेश देण्यात येत आहे.

**आदेश**

चंद्रपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेची महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम ८८ अंतर्गत सुरु असलेली चौकशी पूर्ण करण्यासाठी दिनांक २२ डिसेंबर, २०२४ ते दिनांक २१ मार्च, २०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे. प्राधिकृत अधिकारी यांनी सदर चौकशी या कालावधीत पूर्ण करावी.

विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर यांनी वेळोवेळी या चौकशीच्या कामाचा आढावा घेवून सदर चौकशी वेळेत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२८११५०३४७००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH ARUN PATIL

Digitally signed by SANTOSH ARUN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=ca78467bcc4594e1e11741a7962a7a83feafb176442575037160fc343c4ae5ab, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E52439642AB57C332B2A3E3E46F0D907BA6167409EF6D52C943BF775ECF042FD, cn=SANTOSH ARUN PATIL
Date: 2025.02.28 11:51:23 +05'30'

**(संतोष पाटील)**
**अपर निबंधक तथा सहसचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
२) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर
३) श्री. पी. एस. धोटे, प्राधिकृत अधिकारी तथा सेवानिवृत्त जिल्हा उपनिबंधक (विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर यांचेमार्फत)
४) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था नागपूर.
५) निवडनस्ती